<u>निवडसूची सन २०१५-१६</u>.
पोलीस उप अधीक्षक / सहायक पोलीस
आयुक्त (नि:शस्त्र) या संवर्गातील पदावर
पदोन्नतीने पदस्थापना....

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्र.रापोसे-०११६/प्र.क्र.१८९(४)/पोल-१(अ)
### मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
### दिनांक :-६ मे, २०१७.

<u>वाचा</u> :- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. पोमसं/२/१०२०/निनिसू (१५-१६)/५०/२०१६, दि. २४.४.२०१७.

<u>शासन आदेश</u> :-

पोलीस उप अधीक्षक / सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१५-१६ च्या निवडसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या नि:शस्त्र पोलीस निरीक्षक संवर्गातील खालील अधिकाऱ्यास "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५" संदर्भातील सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २८.४.२०१५ आणि दि. १६.७.२०१५ रोजीच्या, अधिसूचनेतील तरतुदीनुसार महसुली विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले असून, सदर महसुली विभाग वाटपानुसार त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | नि:शस्त्र पोलीस निरीक्षक या पदावरील नियुक्तीचे ठिकाण | नवीन नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. देविदास नामदेव ढोले | यवतमाळ | सहायक पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशी / न्यायालयीन कार्यवाही, प्रलंबित / प्रस्तावित असल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २ एप्रिल, १९७६ च्या परिपत्रकामधील तरतुदीनुसार, त्यांच्याविरूध्द प्रलंबित / प्रस्तावित / संक्षिप्त / प्राथमिक चौकशीअंती त्यांना शिक्षा झाल्यास, सदर शिक्षा ते पदोन्नतीच्या पदावर भोगण्यास तयार असल्याचे हमीपत्र त्यांच्याकडून घेऊनच त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

३. उपरोक्त पदोन्नती, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र: २७९७/२००४ व याचिका क्र.४७०/२००५ मधील अंतिम निर्णयाच्या, तसेच, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या पदांवर मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे स्थगिती आदेश असल्यास, ते विचारात घेऊन उक्त अधिकाऱ्यांस पदस्थापना देण्यात यावी.

५. उक्त पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्याचा निवडणुकीच्या कामकाजाशी संबंध असल्यास, संबंधित जिल्हयात लागू करण्यात आलेल्या निवडणूक आचार संहिता विचारात घेऊन, त्यांना सध्याच्या पदावरून कार्यमुक्त करून, त्यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरित करावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०५०६१६४३११६५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2017.05.06 16:44:56 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**उप सचिव, गृह विभाग.**

**प्रति,**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
२. मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. पोलीस आयुक्त, औरंगाबाद,
८. पोलीस अधीक्षक, यवतमाळ
९. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/यवतमाळ
१०.संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत),
११.निवडनस्ती / पोल-१(अ).